केंद्र पुरस्कृत एकात्मीक प्रक्रीया विकास योजने (IPDS) अंतर्गत मंजूर होणा-या संकुलांना राज्य शासनाकडून अर्थसहाय्य देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. टेक्सपा-२०१४/प्र.क्र. ६१/टेक्स-४**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : १० फेब्रुवारी, २०१५**

वाचा : वस्त्रोद्योग मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.१/१२/२०१२-SITP cell
दिनांक ५ नोव्हेंबर, २०१४

**प्रस्तावना :-**

वस्त्रोद्योगामध्ये वस्त्र प्रक्रिया उद्योग (Textile Processing) हा मुल्यवर्धनासाठी अत्यंत महत्वाचा उद्योग आहे. वस्त्रोद्योगाची स्पर्धा क्षमता ही वस्त्र प्रक्रिया उद्योगावर अवलंबून असते. वस्त्र प्रक्रिया उद्योगांना पाण्याची उपलब्धता, सुरळीत प्रक्रिया, सांडपाणी आणि टाकावू कचऱ्याची विल्हेवाट लावणे इ. समस्यांना प्रामुख्याने सामोरे जावे लागते. वस्त्र प्रक्रिया उद्योगांतील डाईंग आणि ब्लिचिंग या उद्योग घटकांना टाकाऊ पदार्थ व सांडपाण्याची विल्हेवाट लावण्यामध्ये अनेक पर्यावरण विषयक समस्या आहेत. वस्त्र प्रक्रिया उद्योगांना त्या त्या राज्यातील पर्यावरणविषयक मार्गदर्शक सूचना विचारात घ्याव्या लागतात. वस्त्र प्रक्रिया उद्योग हा लघु व मध्यम उद्योगाच्या स्वरुपात आहे. लघु उद्योगांना त्यांच्या आर्थिक क्षमतेमुळे प्रदुषण नियंत्रण यंत्रणा उभारणे शक्य होत नाही.

केंद्र शासनाने ११ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल (SITP) ही योजना सुरु केली. या योजनेचा अनुभव व वस्त्र प्रक्रिया उद्योगापुढील वर नमूद केलेल्या समस्या विचारात घेऊन केंद्र शासनाच्या वस्त्र मंत्रालयाने “एकात्मिक प्रक्रिया विकास” Integrated Process Development (IPDS) ही योजना सुरु केली आहे.

केंद्र शासनाच्या एकात्मिक प्रक्रिया विकास (IPDS) या योजनेचा प्राथमिक उद्देश पर्यावरणपूरक वस्त्रोद्योग प्रक्रिया उद्योग उभारुन भारतीय वस्त्रोद्योग हा जागतिक स्वरुपात स्पर्धाक्षम करणे हा आहे. या योजनेमुळे राज्यातील पर्यावरण विषयक नियम /मार्गदर्शक सूचनेनुसार प्रक्रिया प्रकल्प उभारणे शक्य होईल. या योजनेमुळे नवीन वस्त्र प्रक्रिया संकुल उभारले जातील. त्याचप्रमाणे अस्तित्वातील प्रक्रिया संकुलाचे बळकटीकरण, प्रक्रिया संकुल / क्लस्टर यांना पाणी आणि सांडपाणी व्यवस्थापनात पर्यावरण पूरक संशोधन व विकास प्रकल्प स्थापन करण्यासाठी मदत होईल.

या योजनेंतर्गत अस्तित्वातील वस्त्रोद्योगाच्या गरजा विचारात घेऊन ३-४ विस्तारीकरण प्रकल्प ( Brown Field Project) आणि ३ ते ५ नवीन प्रकल्प ( Green Field Project) उभारण्यात येतील. या योजनेमध्ये खालील प्रकल्पांचा समावेश राहील.

गट -अ - पाणी व सांडपाणी प्रक्रिया संयंत्र व तंत्र (समुद्र / नद्यामध्ये प्रक्रीया केलेले सांडपाणी सोडणे व शून्य सांडपाणी प्रकल्प ) (Including Marine, Riverine and ZLD)

गट - ब - अपरंपरागत / हरित तंत्रज्ञानावर आधारित स्ववापर वीजनिर्मिती यंत्रणा (Captive Power Plant ) या सारख्या सामूहिक मुलभूत सुविधा

गट - क - सामूहिक परिक्षण प्रयोग शाळा आणि संशोधन व विकास केंद्र

केंद्र शासनाचे अनुदान हे गट अ मधील संकुलांना सक्तीचे (Mandatory) असेल. शासकीय अनुदान हे जमीन खरेदीसाठी असणार नाही. जमीन ही विशेष हेतू वाहन कंपनी (SPV )कडून खरेदी करण्यात येईल. जमिनीची किंमत हा प्रकल्पाचा भाग असणार नाही.

अस्तित्वातील वस्त्रोद्योग समूह (Textile Sector) तंत्रज्ञान वृध्दी आणि क्षमतावाढ या वर नमूद बाबी या योजनेत समाविष्ट असतील.

केंद्र शासनाच्या उपरोक्त योजनेअंतर्गत राज्य शासनाकडून राज्यात मंजूर होणाऱ्या प्रकल्पांना अर्थसहाय्य मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद वस्तुस्थितीच्या अनुषंगाने केंद्र पुरस्कृत एकात्मीक प्रक्रीया विकास योजने (Integrated Processing Development Scheme) अंतर्गत राज्यात मंजूर होणाऱ्या संकुलांना प्रकल्प किंमतीच्या २५% किंवा रु. ३७.५० कोटी यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढे अनुदान देण्यास या आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रकल्पासाठी विशेष हेतू वहन कंपनी (SPV) ही सभासदांकडून समभाग, केंद्र शासन, राज्य शासन आणि वित्तीय संस्थाकडून कर्ज स्वरुपात निधी उभारतील.

अ) केंद्र शासन शून्य सांडपाणी प्रक्रिया यंत्रणा ( Zero Liquid Discharge System) प्रकल्पासाठी किंमतीच्या ५०% किंवा कमाल रु. ७५ कोटी अनुदान देईल.

ब) परंपरागत (Conventional) प्रक्रिया पध्दतीसाठी कमाल रु. १० कोटी इतके अनुदान देईल.

क) समुद्रात सांडपाणी सोडणाऱ्या प्रकल्पांचा प्रकरणनिहाय विचार करण्यात येईल व अशा प्रकल्पांना केंद्र शासन कमाल रु. ७५ कोटी अनुदान देईल.

ड) प्रकल्प किंमत ही केंद्र, राज्य, लाभधारक व वित्तीय संस्था यांच्याकडून ५०:२५:१५:१० या प्रमाणात भागविण्यात येईल.

३. प्रकल्पासाठी केंद्र शासनाचा निधी खालीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

१) लाभधारकांनी प्रथम प्रकल्प किंमतीच्या १५% निधी समभाग स्वरुपात एकरकमी उभा करावयाचा आहे.

२) प्रकल्प किंमतीच्या १०% निधी वित्तीय संस्था / बँकाकडून उपलब्ध करुन घ्यावयाचा आहे.

३) केंद्र शासनाचा प्रकल्प किंमतीचा ५०% हिस्सा खालीलप्रमाणे ३ टप्प्यात देण्यात येईल.

पहिला हप्ता - लाभधारकांनी त्यांच्या हिश्याचा निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर केंद्र शासनाच्या अनुदानापैकी ५०% निधी.

दुसरा हप्ता - प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर केंद्र शासनाच्या अनुदानापैकी ३०% निधी

तिसरा हप्ता - प्रकल्प कार्यान्वित होऊन तीन वर्ष पूर्ण झाल्यानंतर केंद्र शासनाच्या अनुदानापैकी २०% निधी

४. राज्य शासनाचे प्रकल्प किंमतीचा २५% इतके अनुदान हे केंद्र शासनाने त्यांच्या हिश्याच्या निधीचा दुसरा हप्ता देईल त्या वेळेस देण्यात येईल. यासाठी केंद्र शासनाकडून राज्य हिस्सा अनुज्ञेय झालेला आहे,याबाबत च्या सूचना प्राप्त झाल्यानंर राज्य हिस्सा वितरीत करण्यात येईल. सदर अनुदान प्रकल्प किंमतीचा २५% किंवा रु. ३७.५० कोटी यापेकी जी रक्कम कमी असेल तेवढे देण्यात येईल.

५. राज्य शासनाकडून प्राप्त होणारा निधी संबंधीत प्रकल्पाच्या / संकुलाच्या नांवे एक दुय्यम खाते (subsidiary account) उघडून त्यामध्ये जमा करण्यात यावा. केंद्र शासनाने Integrated Processing Development Scheme (IPDS) अंतर्गत प्रकल्प उभारणी व निधीवरील नियंत्रणासाठी विशेष हेतू वहन कंपनी (SPV) व प्रकल्प व्यवस्थापन संस्था (PMA) यांची जी जबाबदारी निश्चित केली आहे ती जबाबदारी राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधी संदर्भातही राहील. त्याचप्रमाणे राज्य शासनाने मंजूर केलेल्या अनुदानाच्या वापराबाबत स्पेशल परपज वेहीकल (SPV) व प्रकल्प व्यवस्थापन संस्था (PMA) यांचेबरोबर संचालक, वस्त्रोद्योग यांचीदेखील जबाबदारी राहील.

६. केंद्र शासनाने एकात्मीक प्रक्रीया विकास योजनेच्या (IPDS) अंमलबजावणसाठी निर्धारीत केलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार निधीचे विनियोजन करण्यासंदर्भात बंधपत्र लिहून देण्याची अट घालण्यात आली आहे. त्याप्रमाणे राज्य शासनाच्या हिश्याच्या विनियोजनाबाबत बंधपत्र लिहून

देण्याची जबाबदारी स्पेशल परपज वेहीकल (SPV) ची राहील. तसेच बंधपत्र लिहून घेण्याची जबाबदारी संचालक, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांची राहील.

७. प्रकल्पाला / संकुलाला राज्य शासनामार्फत वितरीत केलेल्या अनुदानाचे योग्य विनियोग होत आहे किंवा कसे याबाबत महालेखापाल यांचेकडून लेखापरीक्षण करण्यात येईल. सदर लेखा परीक्षणासाठी आवश्यक दस्तऐवज महालेखापालांना उपलब्ध करुन देणे प्रवर्तकावर बंधनकारक राहील.

८. केंद्र शासनाच्या योजनेतील इतर अटी व शर्ती पूर्णपणे राज्य योजनेसाठी लागू राहतील.

९. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४५/१५/व्यव-२ दिनांक ०७/०२/२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०२१०१६१८१४३१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Damodar Ambadas Kulkarni

Digitally signed by Damodar Ambadas Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labor, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Damodar Ambadas Kulkarni
Date: 2015.02.10 16:27:54 +05'30'

**( दा. अं. कुलकर्णी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती -**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
५) मा. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव, मंत्रालय, मुंबई
६) महासंचालक, माहिती व प्रसिद्धी संचालनालय, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

१०) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
११) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी ,महाराष्ट्र ओद्योगिक विकास महामंडळ मर्यादित., मुंबई
१३) महाराष्ट्र टेक्सटाईल प्रोसेसर्स असोसिएशन, काळबादेवी, मुंबई - ४०० ००२
१४) महाराष्ट्र स्टेट टेक्सटाईल हँड प्रोसेसर्स असोसिएशन, मुंबई - ४०० ००७
१५) वेस्टर्न महाराष्ट्र प्रोसेसर्स असोसिएशन लि., इचलकरंजी, जि. कोल्हापूर
१६) श्री लक्ष्मी कॉमन इन्फ्लूएंट ट्रीटमेंट प्लांट असोसिएशन, हातकणंगले, जि. कोल्हापूर
१७) अध्यक्ष, मेट्रो हायटेक्स को-ऑप. टेक्सटाईल पार्क लि., इचलकरंजी, जि. कोल्हापूर
१८) अध्यक्ष, प्राईड इंडिया को-ऑप. टेक्सटाईल पार्क लि., इचलकरंजी, जि. कोल्हापूर
१९) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, बारामती हायटेक टेक्सटाईल पार्क लि., बारामती, जि. पुणे
२०) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, दिशान इंफ्रास्ट्रक्चर प्रा.लि., धुळे
२१) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, अस्मिता इंफ्राटेक प्रा.लि., भिवंडी, जि. ठाणे
२२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, इस्लामपूर इंटिग्रेटेड टेक्सटाईल पार्क लि., इस्लामपूर, जि. सांगली
२३) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, लातूर इंटिग्रेटेड टेक्सटाईल पार्क लि., लातूर, जि. लातूर
२४) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, पूर्णा ग्लोबल टेक्सटाईल पार्क प्रा.लि., बसमतनगर, जि. हिंगोली
२५) प्रवर्तक, खेड टेक्सटाईल पार्क, पुणे
२६) प्रवर्तक, सुंदरराव सोळंके को-ऑप. टेक्सटाईल पार्क, बीड
२७) प्रवर्तक, कल्लापाण्णा आवाडे टेक्सटाईल पार्क, कोल्हापूर
२८) प्रवर्तक, एशियाटीक को-ऑप पॉवरलूम टेक्सटाईल पार्क, सोलापूर
२९) व्यवस्थापकीय संचालक, मेगस कन्सलटींग प्रा.लि., मुंबई - ७७.
३०) व्यवस्थापकीय संचालक, आय.एल. अँड एफ.एस.
३१) व्यवस्थापकीय संचालक, टेक्नोपाक कन्सलटींग प्रा.लि.